**अर्थसंकल्पिय अनुदाने २०१०-२०११**
**मागणी क्र.वाय-०७, ७६१०-शासकीय**
**कर्मचारी इत्यादिंना कर्जे (योजनेतर)**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,**
**शासन निर्णय क्र.बीयुडी-१०१०/प्र.क्र.१८६ /पापु-१५,**
**मंत्रालय, मुंबई ४०००३२**
**दिनांक- १७ मार्च, २०११**

**वाचा**-१.वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०.१०/प्र.क्र.७१ /२०१०/अर्थसंकल्प-३, दिनांक १८ मे, २०१०.
२. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-१०१०/प्र.क्र.१८६/पापु १५ दिनांक २४ जून,२०१० व दिनांक १३ ऑक्टोबर, २०१०,दि.२३ डिसेंबर,२०१०

**प्रस्तावना:-**

सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षासाठी विधिमंडळाला सादर करण्यात आलेला अर्थसंकल्प महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०१० (महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) अधिनियम २०१० यांच्या अनुसूचीच्या स्तंभ ४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रकमांसह ) विधिमंडळाने मंजूर केला आहे आणि ते २०१० चा अधिनियम क्रमांक ८ म्हणून महाराष्ट्र राजपत्र असाधारण, भाग-८, दिनांक २७ एप्रिल,२०१० अन्वये प्रसिध्द करण्यात आल्याचे संदर्भाधिन क्र.१ च्या परिपत्रकांन्वये वित्त विभागाने कळविले आहे.

सन २०१०-११ या आर्थिक वर्षात पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (खुद्द) व विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणे अंतर्गत कार्यरत शासकीय कर्मचा-यांना कर्जे इत्यादी वरील खर्च भागविण्यासाठी एकूण रु.१८०.३४ लक्ष मंजूर करण्यात आले आहे. त्यापैकी भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेतील कर्मचा-यांना कर्जे इ.वरील खर्च भागविण्यासाठी रुपये १३५.४१०२ लक्ष इतके अनुदान संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये मंजूर व मुक्त करण्यात आलेले आहे. आता, रु.५.१८लक्ष अनुदान संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेंतर्गत कार्यरत शासकीय कर्मचा-यांना कर्जे इत्यादीवरील खर्च भागविण्यासाठी खालील विवरणपत्रातील स्तंभ-७ मध्ये दर्शविल्याप्रमाणे **रु.५.१८ लक्ष (रुपये पाच लक्ष अठरा हजार फक्त)** एवढे अनुदान संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांच्याकडे या शासन निर्णयान्वये संगणक वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

**(रु. लक्ष)**

| अ. क्र. | उपशिर्ष/गौणशिर्ष | या शासन निर्णयाद्वारे संगणक वितरण प्रणालीवर (BDS)वितरीत करण्यात येत असलेले अनुदान |
|---|---|---|
| १. | २. | ३. |
| १. | २०१ घरबांधणी अग्रिम (७६१० १५८४) | ५.१८ |
| | एकूण दत्तमत | ५.१८ (रुपये पाच लक्ष अठरा हजार फक्त) |

२. उपरोक्त बाबी वरील खर्च " मागणी क्र.वाय-७, ७६१०-शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्जे " या प्रधान लेखाशिर्षा खाली दर्शविण्यात यावा.तसेच, उपलब्ध तरतूद मासिक निधी विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे खर्च करण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharahtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०११०३१७१९१२५६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(श.वि.दुर्वे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत:

१. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
२. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, सर्व
३. वरिष्ठ भूवैज्ञानिक , भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,सर्व
४. उप अभियंता (यां), भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,सर्व
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई/२ नागपूर (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता)
६. वित्त विभाग, अर्थसंकल्प-१६ ( २ प्रती)
७. कक्ष अधिकारी/ लेखा अधिकारी,पापु-०४, पापु-०७, पापु-२०
८. निवड नस्ती पापु-१५